ई-फेरफार व ई-चावडी या प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी राज्यातील तहसिलदार, उप अधीक्षक भूमि अभिलेख व नगर भूमापन अधिकारी यांच्या राज्यातील एकूण ७४१ कार्यालयांमध्ये मे. भारत संचार निगम लि. या संस्थेकडून स्थापित करण्यात आलेली VPNoBB कनेक्टिव्हीटी चे माहे मार्च २०१५ पर्यंतचे आवश्यक शुल्क अदा करणे बाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २०१४/प्र.क्र-८५ /ल-१
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- ३१ मार्च २०१५

वाचा
१) दि.१६/१०/२०१२ च्या ७३ व्या उच्चस्तरीय समीतीच्या बैठकीचे इतिवृत्त
२) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक राभूअ २०१३/ प्र.क्र.२/ ल-१ दि.०४/०१/२०१३
३) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक राभूअ २०१२/ प्र.क्र ४५०/ ल-१ दि.२१/०१/२०१३
४) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा दि.२०/०२/२०१५ चा प्रस्ताव

प्रस्तावना:-

केंद्र शासनाच्या राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम (ई धरती) या कार्यक्रमांतर्गत “ई-फेरफार“ (फेरफार प्रक्रीयेचे संगणकीकरण) व “ई-चावडी“ (गाव दप्तराचे संगणकीकरण ) प्रकल्प राज्यात राबविण्यांत येत आहेत. मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली ७३ व्या उच्चाधिकार समितीच्या दिनांक १६/१०/२०१२ रोजी झालेल्या बैठकीतील मान्यतेस अनुसरून सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरीता क्षेत्रीय पातळीवरील विविध कार्यालयांना आवश्यक असणारी कनेक्टिव्हीटी पुरविणेकरीता मे. भारत संचार निगम लि. व मे. महानगर टेलिकॉम निगम लि. या संस्थांची निवड करण्यात आलेली आहे. त्यानुसार राज्यातील तहसीलदार, उप अधीक्षक भूमि अभिलेख व नगर भूमापन अधिकारी यांच्या एकूण ७४१ कार्यालयांना मे. भारत संचार निगम लिमिटेड व मे.महानगर टेलिकॉम निगम लि. यांच्याकडून अनुक्रमे Virtual Private Network over Broadband (VPNoBB) व MPLS VPN कनेक्टिव्हीटी एक वर्षाकरीता स्थापित करण्यासाठी दिनांक २१/०१/२०१३ रोजीच्या संदर्भ ३ क्र. शासन निर्णयानुसार निधी वितरणास मंजुरी देणेत आलेली आहे. सदर कनेक्टिव्हिटी चालू ठेवण्याच्या दृष्टीने मे. भारत संचार निगम लिमिटेड व मे. महानगर टेलिकॉम निगम लि. यांना माहे मार्च -२०१५ अखेर पर्यंत शुल्क अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

“ई-फेरफार“ या प्रकल्पांतर्गत राज्यातील सर्व तहसिलदार, उपअधीक्षक भूमि अभिलेख व नगर भूमापन अधिकारी यांच्या कार्यालयामध्ये कनेक्टिव्हीटी सुरू ठेवणेकरीता मे.भारत संचार निगम लि. व मे.महानगर टेलिकॉम निगम लि. या संस्थांकडून घेणेत आलेल्या अनुक्रमे VPNoBB व MPLS VPN कनेक्टिव्हीटीकरीता सदर संस्थांना माहे मार्च-२०१५ अखेर पर्यंतचे शुल्क अदा करण्याकरीता अनुक्रमे रक्कम रूपये २,६४,२६,३०६ /- (सर्व करासह) व रक्कम रूपये २५,८६,७२३/- (सर्व करासह) असे एकुण रक्कम रूपये २,९०,१३,०२९/- (सर्व करासह) (अक्षरी रूपये दोन कोटी नव्वद लाख तेरा हजार एकोणतीस फक्त) तरतूद खर्च करण्यास व वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर तरतूद जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडे या शासन निर्णयाव्दारे सुपुर्द करण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च " मागणी क्र. सी.१, २०२९ जमीन महसूल १०३, जिल्हा भूमि अभिलेख (०२) संचालक भूमि अभिलेख २०२९ ०४२२ (१७) संगणक खर्च (योजनेतर)" या लेखाशीर्षाखाली सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षात मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. या प्रयोजनासाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून राहतील. सदर निधीच्या विनियोगासाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत तसेच खर्चाचा ताळमेळ महालेखापालांकडे वेळोवेळी देण्याची दक्षता घ्यावी. प्रस्तुत निधीबाबत आर्थिक व भौतिक अहवाल उपयोगिता प्रमाणपत्रासह शासनास पाठवावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र १४० / २०१५/ व्यय-१० दिनांक - ३१/०३/२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११८०१४११११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Madhav Vitthal Veer

Digitally signed by Madhav Vitthal Veer
DN: CN = Madhav Vitthal Veer, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.04.01 15:18:20 +05'30'

**( डॉ. माधव वीर )**
उप सचिव,
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
५) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
६) मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव
७) अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
८) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (महाराष्ट्र राज्य), पुणे
९) सर्व विभागीय आयुक्त
१०) नोंदणी महानिरिक्षक व मुद्राक नियंत्रक ,महाराष्ट्र राज्य, पुणे
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१४) कोषागार अधिकारी, पुणे
१५) राज्य सूचना विज्ञान अधिकारी, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, मुंबई
१६) माहिती जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती प्रसिध्दीकरीता)
१७) माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) नियोजन विभाग, का.क्र.१४७५, मंत्रालय, मुंबई
१९) वित्त विभाग,कार्यासन क्र. व्यय १०/अर्थसंकल्प-६, मंत्रालय, मुंबई